# महाराष्ट्र शासन

**पर्यावरण विभाग, मंत्रालय,**

**शासन निर्णय क्रमांक: इएनव्ही २००१/२३३/प्र.क्र.७३/तां.क्र.१**

**१५ वा मजला, नविन प्रशासन भवन, मुंबई-३२.**

**दिनांक : १८ मार्च, २००२.**

प्रस्तावना :- केंद्र शासनाच्या दिनांक २ मार्च, २००१ व ५ मार्च, २००१ च्या पत्रान्वये कळविले आहे की, दि. २९-३० जानेवारी, २००१ च्या दरम्यान कोईमतूर येथे सर्व राज्य, केंद्रशासित प्रदेश व मा.मंत्री (पर्यावरण व वने) यांची परिषद झाली. सदर परिषदेमध्ये असे ठरले की, देशभरातील विद्यार्थ्यांमध्ये पर्यावरण विषय जागरूकता निर्माण करण्यासाठी देशभरातील सुमारे १०००० शाळेमधून नॅशनल ग्रीन कॉपर्सची स्थापना करावी. ही योजना १०० टक्के केंद्र शासन पुरस्कृत आहे. त्यासाठी महाराष्ट्रासाठी नोडल ऑफिसर म्हणून संचालक, राज्य विज्ञान शिक्षण संस्था, रविनगर, नागपूर यांची नेमणूक करण्यात आली आहे व तसेच डॉ.इरीक भरुचा, संचालक, भारतीय विद्यापीठ पुणे यांची रिसोर्स एजन्सी म्हणून नेमणूक करण्यात आली आहे. नॅशनल ग्रीन कॉपर्स ही योजना राबविण्यासाठी केंद्र शासनाने सुचविल्याप्रमाणे आता शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय :- (अ) राज्य पातळीवर सदर योजना राबविण्यासाठी व सनियंत्रित करण्यासाठी राज्यस्तरीय सनियंत्रण समितीची स्थापना खालील प्रमाणे करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) | प्रधान सचिव (पर्यावरण) | अध्यक्ष |
| २) | सदस्य सचिव, म.प्र.नि.मंडळ, मुंबई | सदस्य |
| ३) | सचिव (शालेय शिक्षण) | सदस्य |
| ४) | सचिव (वने) | सदस्य |
| ५) | सचिव (जलसंधारण) | सदस्य |
| ६) | सचिव (आरोग्य) | सदस्य |
| ७) | नोडल अधिकारी | सदस्य सचिव |

(ब) जिल्हा पातळीवर सदर योजना राबविण्यासाठी व सनियंत्रित करण्यासाठी जिल्हास्तरीय सनियंत्रण समितीची स्थापना खालील प्रमाणे करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २) | मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.सदस्य | |
| ३) | उपवन संरक्षक | सदस्य |
| ४) | उपसंचालक, सामाजिक वनीकरण | सदस्य |
| ५) | प्रादेशिक/उपप्रादेशिक अधिकारी, म.प्र.नि.मंडळ | सदस्य |
| ६) | जिल्हाधिकारी यांनी (निवडलेले) शिफारस केलेले १ अशासकीय संस्था. (आवश्यकतेप्रमाणे शासनाची मान्यता घेण्यात यावी.) | सदस्य |
| ७) | शिक्षणाधिकारी | सदस्य सचिव |

GR-20020814174812000 - 2200

या समितीची कामे खालील प्रमाणे राहतील :-

१. त्याबाबत शाळेचे नामनिर्देशन करणे.

२. इको-क्लब ची स्थापना करुन पर्यावरणविषयी जनजागृती करणे.

३. झालेल्या कार्यवाहीची त्रैमासिक अहवाल नोडल ऑफिसरकडे पाठविणे.

(क) नोडल ऑफिसरची जबाबदारी खालील प्रमाणे राहिल :-

१. मास्टर ट्रेनर्स यांचे नामनिर्देशित करणे.

२. मास्टर ट्रेनर्स यांना ट्रेनिंग देणे.

३. जिल्हास्तरीय समितीची स्थापना करणे.

४. माहिती गोळा करणे.

५. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वानुसार अनुदान खर्च करणे.

(ड) मास्टर ट्रेनरची कामे खालील प्रमाणे राहतील :-

जिल्ह्यातील मास्टर ट्रेनर यांनी जिल्ह्यातील ज्या शाळेची नांवे नामनिर्देशित झालेली आहेत त्या शाळेतील शिक्षकांना ट्रेनिंग देणे व ह्या प्रशिक्षित शिक्षकांनी इको-क्लबच्या सभासदांना ट्रेनिंग देणे.

इको-क्लबची रचना खालील प्रमाणे राहिल :-

(इ) इको क्लब :- नामनिर्देशित प्रत्येक शाळेत ३० ते ५० विद्यार्थ्यांचा एक इको-क्लब तयार करण्यांत येईल. या इको क्लबचा प्रमुख त्याच शाळेतील एक शिक्षक असेल. या इको-क्लबचे काम पर्यावरण विषयक विविध कार्यक्रम आयोजित करणे, त्यात झाडे लावणे, चर्चासत्र आयोजित करणे, सभा आयोजित करणे, मानवी साखळी तयार करणे, इत्यादी असेल.

इको क्लब खालील विषयावर कामे करील :-

१. घरातील कचऱ्याची विल्हेवाट

२. जैविक घनकचऱ्याची विल्हेवाट

३. पाणी साठवण व प्रदूषण

४. हवा प्रदूषण

५. नागरी सुखसोयींचा अभाव

६. शहरातील झाडे लावणे व संवर्धन करणे.

७. सार्वजनिक वाहनतळ व बगीचा

८. लोकांमध्ये पर्यावरणाचा विकास, कृती व वागणूक.

९. इको क्लबचा बायो-डायव्हर्सिटी मध्ये महत्वाचा सहभाग.

(फ) अशा प्रकारे तयार झालेल्या ग्रीन कॉपर्स् मध्ये सहभाग घेणाऱ्यांना इको क्लबच्या विद्यार्थ्यांना बिल्ला टोप्या व जनजागृतीसाठी भित्तीपत्रके देण्याची कार्यवाही महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळाने करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(आ.म.आवाव)

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

राज्यपालांचे सचिव, महाराष्ट्र राज्य

मुख्यमंत्र्यांचे सचिव
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मुख्यसचिव
अतिरिक्त मुख्यसचिव
शासनाचे सर्व प्रधान सचिव / सचिव
प्रधान मुख्य वन संरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ, मुंबई.
संचालक, सामाजिक वनीकरण, पुणे.
सहसचिव (वने), महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
सहसचिव(जलसंधारण), ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई.
संचालक, आरोग्य सेवा, सेंट जॉर्जेस रुग्णालय आवार, मुंबई.
संचालक, राज्य विज्ञान शिक्षण संस्था, रविनगर, नागपूर.
डॉ.इरिक भरुचा, संचालक, भारती विद्यापिठ, पुणे.
सर्व जिल्हाधिकारी.
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
सर्व मंत्रालयीन विभाग.
निवड नस्ती (तां.क.१)